**जागतिक हेरिटेज दिवसाच्या निमित्ताने स्थानिक संस्थांमध्ये "माझे हेरिटेज" (My Heritage) ही स्पर्धा आयोजित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक अभियान २०२२/ प्र.क्र.३६/तां.क.१**
शहीद भगतसिंग चौक, मदाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: १८ एप्रिल, २०२२

**शासन निर्णय :**

युनेस्को तर्फे दरवर्षी **१८ एप्रिल** हा दिवस "**जागतिक हेरिटेज दिन**" म्हणून साजरा केला जातो. आपल्या परिसराचा विकास करताना अथवा प्रकल्प निर्माण करताना हेरिटेज वास्तूंना आपण विसरून जातो, संवर्धनाकडे दुर्लक्ष होते. आधुनिकपणा बरोबर नावीन्याची कास धरताना आम्ही आमचा वैभवशाली वारसा विसरत चाललोय. त्यामुळे, स्थानिक संस्थांमधील हेरिटेज वास्तूंचे जतन व संवर्धन करणे आवश्यक आहे.

२. यास्तव स्थानिक संस्थांमधील **किल्ले (FORT), वृक्ष, विहिरी, नदी व तलाव** या हेरिटेज वास्तूंचे जतन व संरक्षण करण्यासाठी **"माझे हेरिटेज" (My Heritage) ही स्पर्धा आयोजित करण्यास शासन मान्यता देत आहे**.

३. सदर स्पर्धा हि दिनांक १८ एप्रिल, २०२२ ते २८ फेब्रुवारी, २०२३ या कालावधीत आयोजित करण्यात येईल. या स्पर्धेअंतर्गत करण्यात आलेल्या कामाचे मुल्यमापन त्रयस्त यंत्रणे मार्फत दिनांक १ मार्च, २०२३ ते ३१ मार्च, २०२३ या कालावधीत करण्यात येईल व या स्पर्धेचा बक्षिस समारंभ जागतिक हेरिटेज दिना दिवशी म्हणजे दिनांक १८ एप्रिल, २०२३ रोजी करण्यात येईल.

४. स्थानिक संस्थांना या स्पर्धेमध्ये सहभागी होण्यासाठीची मार्गदर्शक तत्वे, गुणांकन कार्यपध्दती, मुल्यमापनाची कार्यपध्दती इत्यादी बाबतच्या सविस्तर सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०४२२१२०७४४२९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANDIP S
KAMBLE

Digitally signed by SANDIP S KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d7be2b5d92ced254370f6b4a45426167ed60f51dcb34812d7d246c9a9c8557c, pseudonym=79EA9C474F7D4F5206B9ED0C363B11911F0A3D59, serialNumber=1E6E3F448F34D1DD3C4B0B04F8D07D573564E9568C0F01BBF302B61CD08D36F2, cn=SANDIP S KAMBLE
Date: 2022.04.22 12:09:08 +05'30'

**( संदिप कांबळे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल यांचे खाजगी सचिव.
४. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
५. प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व विभागीय आयुक्त
७. सर्व जिल्हाधिकारी.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
९. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत), जिल्हा परिषद
१२. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती.
१३. ग्राम विकास अधिकारी / ग्राम सेवक, ग्राम पंचायत (सर्व)
१४. निवडनस्ती